तात्काळ

दिनांक ११ मे, २००० रोजी होणाऱ्या कर्मचाऱ्यांच्या लाक्षणिक संपाबाबत करावयाची कार्यवाही.

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक, क्रमांकः एसटीके-१०००/१०५७/प्र.क्र.३१/२०००/१६-अ,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ९ मे, २०००.

## परिपत्रक

शासकीय वाहन चालक व यांत्रिकी संघटना, मंत्रालय, मुंबई व राज्य सरकारी कर्मचारी मध्यवर्ती संघटन मुंबई यांनी दि.११ मे, २००० रोजी शासकीय कर्मचाऱ्यांच्या एक दिवसाच्या लाक्षणिक संपाची सूचना दिली आहे तसेच बृहन्मुंबई राज्य सरकारी कर्मचारी संघटना व महाराष्ट्र राज्य चतुर्थश्रेणी कर्मचारी संघटना, जि.मुंबई यांनी शासकीय कर्मचाऱ्यांना दि.११ मे, २००० रोजी एक दिवसाचा लाक्षणिक संप करण्याचे आवाहन केले आहे त्यानुसार शासनाचे व जिल्हा परिषदांचे गट "क" व गट "ड" मधील कर्मचारी संपात भाग घेण्याची शक्यता आहे शासकीय कर्मचाऱ्यांच्या दि.११ मे, २००० रोजी होणाऱ्या एक दिवसाच्या लाक्षणिक संपकाळात शासकीय काम सुरळीतरित्या चालण्याच्या दृष्टीने पुढे दर्शविल्याप्रमाणे उपाययोजना करण्याच्या सूचना देण्यात येत आहेत :-

१) शासकीय कर्मचाऱ्यांनी संपात भाग घेणे गैरवर्तणूक समजण्यात येईल व अशा कर्मचाऱ्याविरुध्द शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात येईल अशा प्रकारचे आदेश निर्गमित करण्यात यावेत व ते सर्व कर्मचाऱ्यांच्या निदर्शनास आणून त्या आदेशाची प्रत सूचना फलकावर लावण्यात यावी.

२) कर्मचाऱ्यांनी संपात भाग न घेण्याविषयी व नेहमीप्रमाणे कार्यालयात उपस्थित राहण्यासाठी त्यांचे मन वळविण्याचा प्रयत्न करावा.

३) संपकाळात कार्यालये उघडण्याची व बंद करण्याची योग्य ती व्यवस्था करावी व ती व्यवस्था जबाबदार अधिकाऱ्याकडे द्यावी. गरज भासल्यास गृहरक्षक दलाची मदत घ्यावी.

४) कार्यालयप्रमुखांनी संपकाळात आपले मुख्यालय सोडून जावू नये.

५) कार्यालय प्रमुखांनी या आदेशाच्या दिनांकापासून लाक्षणिक संप संपेपर्यंत कुठल्याही शासकीय कर्मचाऱ्यास कुठल्याही प्रकारची रजा मंजूर करु नये आणि जे कर्मचारी रजेवर असतील अशा प्रत्येक प्रकरणी विचार करुन त्यांची रजा रद्द करुन त्यांना कामावर तात्काळ बोलवावे किंवा कसे ते ठरवावे.

२. सर्व मंत्रालयीन विभागांनी आपल्या अधिपत्याखालील कार्यालयामध्ये अत्यावश्यक सेवा संपकाळात सुरळितपणे सुरु राहतील याबाबत उपाययोजना कराव्यात.

३. ह्या परिपत्रकातील सूचना विभाग प्रमुखांनी आपल्या अधिपत्याखालील कार्यालय प्रमुखांना कळविण्याची व्यवस्था करावी.

४. केलेल्या कार्यवाहीची माहिती सोबतच्या प्रपत्रात या विभागास दि.११.५.२००० रोजी दूपारी १२ वाजेपर्यंत कळवावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( एस. हबीबउल्लाह )
अपर मुख्य सचिव.

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,

उपमुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव /सचिव,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
मंत्रालयीन विविध विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व इतर विभागप्रमुख व कार्यालय प्रमुख,
प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
प्रबंधक, लोकआयुक्त आणि उपलोकआयुक्त यांचे कार्यालय,मुंबई,
मंत्रालयातील सर्व विभाग,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती.

पत्राने.

# प्रपत्र

विभागातील / कार्यालयातील कर्मचाऱ्यांची दि.११.५.२००० रोजी असलेल्या
उपस्थितीबाबतची माहिती.

| विभागातील अधिकारी/कर्मचारी | पूर्व परवानगीने रजेवर असलले (संख्या) | संपात सहभागी झालेले (संख्या) | कार्यालयात उपस्थित असलेले (संख्या) |
|---|---|---|---|
| गट - अ | | | |
| गट - ब | | | |
| गट - क | | | |
| गट - ड | | | |